अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-२१२५/प्र.क्र.११६(१)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ जून, २०२५.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना त्यांच्या विनंतीनुसार, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधीक्षक अभियंत्यांचे नाव | सध्याची पदस्थापना | बदली नंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्रीमती अश्विनी अविनाश घुगे. | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई. (शिबीर कार्यालय, अमरावती) | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर. (श्रीमती बोंद्रे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| २ | श्रीमती सुषमा चिंतामणी बोंद्रे. | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर. | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ. (रिक्त पदी) |
| ३ | डॉ. श्री. सलीम गुलाब शेख | सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर. | अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर, मुंबई. (श्रीमती सापटणेकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| ४ | श्रीमती संध्या जयप्रकाश सापटणेकर. | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर, मुंबई. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई. (श्री.बारवरकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| ५ | श्री. धन्यकुमार दत्तात्रय बारवकर. | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई. | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदूर्ग. (रिक्त पदी) |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | श्री. विनोदकुमार मधुकर भदाणे. | प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, नाशिक. | अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, छत्रपती संभाजीनगर. (रिक्त पदी) |
| ७ | श्री. विजय आत्माराम पाटील. | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक. | अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, नाशिक. (श्री.भदाणे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| ८ | श्री. सुरेंद्र अरविंद कंकरेज. | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, पुणे. | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नाशिक. (श्री.पाटील यांच्या दि.३१.०७.२५ रोजीच्या सेवानिवृत्तीमुळे रिक्त होणाऱ्या पदी) |
| ९ | श्री. शामराव पांडुरंग कुंभार. | पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई. (शिबीर कार्यालय, पुणे.) | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सोलापूर. (श्री.माळी यांच्या जागी) |
| १० | श्री. गजेंद्र हिरालाल राजपूत. | पदस्थापनेच्या प्रतिक्षेत. | अधीक्षक अभियंता, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, मुंबई. (रिक्त पदी) |

२. वर नमूद तक्त्यातील सर्व अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. वर नमूद तक्त्यातील सर्व अधिकाऱ्यांना म. ना. से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहील. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, वर नमूद सर्व अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser१.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. वर नमूद तक्त्यातील विनंतीने बदली झालेले अधिकारी वगळून इतर सर्व अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

५. वर नमूद तक्त्यातील सर्व अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०६१७०३२४०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2025.06.06 17:04:11 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (सार्वजनिक उपक्रम) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मर्यादित, मुंबई.
११. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /कोकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर / राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
१३. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४. संचालक (उपवने व उद्याने), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१५. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप, पुणे,
१६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, _______________
१७. सर्व अधिकाऱ्यांना संबंधित मुख्य अभियंता यांच्या कार्यालयामार्फत,
१८. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१९. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२०. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२१. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२२. सचिव ( रस्ते / बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२३. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. कार्यासन अधिकारी ( सेवा-६ / संगणक कक्ष ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. निवडनस्ती.